एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम
राज्य सेवा परीक्षेद्वारे मुलाखतीकरीता निवड झालेल्या उमेदवारांच्या वैद्यकीय तपासणीबाबत.

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग
शासन निर्णय क्रमांक : टिआरएन-०२१७/ प्र.क्र.०२ /सीपीटीपी
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २७ जून, २०२३.

संदर्भ - १. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. टिआरएन २०१३/प्र.क्र.८४/१३/१२अ, दिनांक २०.१.२०१४.
२. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. टिआरएन-०२१६/प्र.क्र.५८/सीपीटीपी, दिनांक ०४.०१.२०१७.
३. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. टिआरएन ०११७/ प्र.क्र.०२/सीपीटीपी, दिनांक ०२.०२.२०१७

प्रस्तावना :-

महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत राज्यसेवा परीक्षेद्वारे शासन सेवेत नियुक्त होणाऱ्या अधिकाऱ्यांसाठी अखिल भारतीय सेवेतील अधिकाऱ्यांप्रमाणे दोन वर्ष कालावधीचा एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षणाचा कार्यक्रम सुरु करण्याबाबतचा धोरणात्मक निर्णय उपरोक्त संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये घेतला आहे. यानुसार गट "अ" आणि गट "ब" ( राजपत्रित ) संवर्गातील अधिकाऱ्यांकरीता एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम अनुक्रमे यशदा, पुणे आणि वनामती, नागपूर या प्रशिक्षण संस्थांमार्फत राबविला जात आहे. सदर शासन निर्णयातील परिच्छेद क्रमांक ९ येथे खालीलप्रमाणे तरतूद करण्यात आली होती :-

"महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून मुलाखतीसाठी निवड झालेल्या उमेदवाराची मुलाखतीपूर्वी संबंधित मुलाखत केंद्राच्या ठिकाणी असलेल्या शासकीय वैद्यकीय महाविद्यालयात वैद्यकीय तपासणी केली जाईल. त्यासाठी आवश्यक सोई-सुविधा व यंत्रणा वेळेवर उपलब्ध करुन देण्याच्या सूचना वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागामार्फत संबंधित वैद्यकीय महाविद्यालयांच्या अधिष्ठात्यांना देण्यात येतील"

उपरोक्त तरतूदीच्या अनुसार राज्यसेवा मुख्य परीक्षेचा निकाल जाहिर झाल्यानंतर मुलाखतीसाठी शिफारसप्राप्त ठरलेल्या उमेदवारांची मुलाखतीच्या टप्प्यावर वैद्यकीय तपासणी करण्यात येत होती. तथापि, संदर्भाधीन अनुक्रमांक ३ येथील शासन निर्णयान्वये सदर कार्यपद्धतीमध्ये बदल करुन राज्य सेवा परीक्षेद्वारे मुलाखतीसाठी निवड झालेल्या उमेदवारांऐवजी या परीक्षेच्या अंतिम निकालाद्वारे शिफारस केलेल्या उमेदवारांची वैद्यकीय तपासणी करण्याचा निर्णय घेण्यात आला आहे.

वैद्यकीय तपासणीसंदर्भातील उपरोक्त नमूद प्रक्रियेमुळे शिफारशीनंतर नियुक्तीच्या वेळी वैद्यकीय तपासणीमध्ये उमेदवार शिफारसप्राप्त पदासाठी अपात्र ठरल्यास उमेदवाराची अन्य पदावर निवड होऊ शकत नाही व अन्य पदांसाठी अर्हताकारी गुण प्राप्त असूनही उमेदवार निवड प्रक्रीयेतून बाद ठरतो. या अनुषंगाने राज्यसेवा परीक्षेद्वारे मुलाखतीसाठी निवड झालेल्या सर्व उमेदवारांची वैद्यकीय तपासणी करुन प्राप्त

वैद्यकीय अहवाल व उमेदवारांनी दिलेला पदांचा प्राधान्यक्रम यानुसार अंतिम शिफारस करणे शक्य व्हावे याकरीता उमेदवारांच्या वैद्यकीय तपासणीसंदर्भातील विहित कार्यपध्दतीमध्ये बदल करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार शासनाने आता खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे :-

**शासन निर्णय :**

१. महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या राज्य सेवा परीक्षेच्या पूर्व परीक्षा व मुख्य परीक्षेनंतर मुलाखतीसाठी पात्र ठरलेल्या उमेदवारांची वैदयकीय तपासणी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून मुलाखतीच्या टप्प्यावर आयोजित करण्यात येईल.

२. मुलाखतीस पात्र ठरलेल्या सर्व उमेदवारांना आयोगाकडून वैद्यकीय चाचणीसाठी निश्चित केलेल्या ठिकाणी पर्याप्त विभागीय वैद्यकीय मंडळे (DMB) स्थापन करुन, वैद्यकीय तपासणीकरीता बोलावण्यात येईल. याकरीता आयोगाकडून आवश्यक सूचनांसह वैद्यकीय तपासणी पत्र ऑनलाईन पद्धतीने उमेदवारांना देण्यात येईल.

३. वैद्यकीय मंडळासमोर तपासणीकरीता प्रतिदिन पाठवावयाच्या उमेदवारांची संख्या, मुलाखतीस पात्र ठरणा-या उमेदवारांची संख्या विचारात घेऊन वैद्यकीय मंडळाशी चर्चेद्वारे त्या त्या वेळी आयोगाकडून निश्चित करण्यात येईल.

४. तपासणी झालेल्या उमेदवारांचा वैद्यकीय अहवाल विहित पद्धतीने अपलोड करणे तसेच निकाल प्रक्रियेकरीता आवश्यक विदा नोंदविण्याच्या कामाकरीता आयोगाकडून विभागीय वैद्यकीय मंडळास आयोगाच्या संकेतस्थळावर बाह्यलिंक उपलब्ध करुन देण्यात येईल.

५. वैद्यकीय मंडळाने सादर केलेला संबंधित उमेदवाराचा वैद्यकीय तपासणी अहवाल उमेदवाराच्या माहितीसाठी आयोगाच्या ऑनलाईन अर्जप्रणालीवरील उमेदवाराच्या खात्यामध्ये उपलब्ध करुन देण्यात येईल.

६. वैद्यकीय तपासणी अहवालावर उमेदवारास अपील करावयाचे असल्यास त्याकरीता ७ दिवसांचा कालावधी आयोगाकडून उपलब्ध करुन देण्यात येईल. तसेच अपील करण्यासाठी उमेदवाराच्या खात्यात अपील अर्ज ऑनलाईन पद्धतीने सादर करण्याची सुविधा देण्यात येईल.

७. अपील केलेल्या सर्व उमेदवारांना केवळ मुंबई येथील शासकीय वैद्यकीय महाविद्यालयामध्ये अपिलीय वैद्यकीय मंडळ (AMB) स्थापन करुन सदर मंडळाकडे वैद्यकीय तपासणीकरीता बोलाविण्यात येईल. अपिलीय वैद्यकीय मंडळाची स्थापना शासनाकडून करण्यात येईल.

८. विभागीय वैद्यकीय मंडळ व अपीलीय वैदयकीय मंडळांनी सादर केलेले वैद्यकीय तपासणी अहवाल विचारात घेऊन, उमेदवार ज्या संवर्गाकरीता वैद्यकीयदृष्ट्या तसेच शारीरिक व शैक्षणिक निकषानुसार पात्र असेल, केवळ त्याच संवर्गाकरीता उमेदवारास पसंतीक्रम सादर करण्याची मुभा आयोगाकडून देण्यात येईल.

९. सदर वैद्यकीय तपासणीच्या आधारे संबंधित संवर्गासाठी उमेदवारांची पात्रता / अपात्रता विचारात घेऊन शिफारसप्राप्त उमेदवारांची निवडयादी तयार करण्याच्या दृष्टीने महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत कार्यवाही करण्यात येईल.

१०. महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून मुलाखतीपूर्वी उमेदवारांची वैद्यकीय तपासणी केल्यापासून उमेदवारास शिफारसप्राप्त पदावर नियुक्ती देण्यापर्यंतचा कालावधी एक वर्षापेक्षा अधिक झाल्यास शिफारसप्राप्त उमेदवारांची नियुक्तीपूर्व पुनःश्च वैद्यकीय तपासणी करणे आवश्यक राहील.

सदर शासन निर्णय "वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग" आणि "सार्वजनिक आरोग्य विभाग" यांच्या अनुक्रमे दिनांक १५ फेब्रुवारी, २०२३ व दिनांक ३० मे, २०२३ च्या अनौपचारिक संदर्भान्वये प्राप्त सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे. सदर शासन निर्णय राज्य सेवा (मुख्य) परीक्षा, २०२२ पासून लागू होईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०६२७१५५२५१४९०७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

LEENA ASHISH SANKHE

Digitally signed by LEENA ASHISH SANKHE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=522242e2259dbf8fc1aed336674ebf6138607b16aacbbed00301a9e43c62f6c7, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=783CA3332598C7E1C28393EA543FA05D9FB77F36A848F4738D12288E105699F4, cn=LEENA ASHISH SANKHE
Date: 2023.06.27 15:56:14 +05'30'

**( लिना संखे )**
**उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग**

**प्रति**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई - 32,
२. मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई - 32,
३. अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव (महसूल / गृह / ग्राम विकास / वित्त / सहकार/ नगर विकास / राज्य उत्पादन शुल्क / परिवहन/ सामान्य प्रशासन / शालेय शिक्षण /उद्योग, उर्जा व कामगार विभाग / आदिवासी विकास / महिला व बालविकास विभाग ).
४. अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई,
५. सर्व जिल्हाधिकारी / मुख्य कार्यकारी अधिकारी
६. महासंचालक, यशदा, राजभवन आवार, बाणेर रोड, पुणे,
७. कुलगुरु, मुंबई विद्यापिठ , कलिना सांताकूझ, मुंबई.
८. संचालक, वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन संस्था (वनामती), नागपूर,
९. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (**पत्राद्वारे),
१०. निवडनस्ती कार्यासन - सीपीटीपी .